मौजे गल्लेबोरगांव (ता.खुलताबाद जि. औरंगाबाद) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः क्र. पापुयो - २०१७/प्र.क्र. १३ /पापु १८**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीखः २० फेब्रुवारी, २०१७**

**वाचा -**

१) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे तांत्रिक मान्यता आदेश क्र.६८०, दिनांक ११/०८/२०१४.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे आदेश क्र.जिपऔ/पापु/निविदा/२०१४, दिनांक १४/०८/२०१४.

३) शासन पत्र क्रमांक पापुयो२०१५/७४/प्र.क्र.५६/पापु-१८, दिनांक २०/०४/२०१५.

४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे तांत्रिक मान्यता आदेश क्र.७५१, दि. ०३/०१/२०१७.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद क्र. जिपऔ/पापु/तांशा/२०१७/१२८, दि. २१/०१/२०१७.

**प्रस्तावना**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे गल्लेबोरगांव (ता.खुलताबाद जि. औरंगाबाद) नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१,२०,९३,४५०/-(ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.**१** येथील पत्रान्वये मुळ तांत्रिक मान्यता दिली होती. जिल्हा जलव्यवस्थापन समितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये सदर योजनेच्या जादा दराच्या निविदेस शासनाने मान्यता दिली आहे. तथापी सदर योजनेच्या जादा दराची निविदा स्विकृत केल्याने तसेच वितरण व्यवस्थेत वाढ आणि विहीरीच्या खोदकामात वाढ झाल्याने योजनेच्या खर्चात वाढ झाली असल्याने कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या **रु.१,३७,९६,७८४/-(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित

प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.५ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे गल्लेबोरगांव (ता.खुलताबाद जि. औरंगाबाद ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१,३७,९६,७८४/-(ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी सदोतीस लक्ष शहाण्णव हजार सातशे चौऱ्याऐंशी फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

### अटी

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, औरंगाबाद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी व कंत्राटदार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. १७,०३,३५८/- (अक्षरी रुपये सतरा लक्ष तीन हजार तीनशे अठ्ठावन्न फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२०१५४११६७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Deoram Ambekar
Date: 2017.02.20 15:42:44 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

४)  जिल्हाधिकारी, औरंगाबाद.

५)  मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद

६)  महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.

७)  महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई

८)  संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.

९)  अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद

१०) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.

११) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि  विकास यंत्रणा,  पुणे

११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद.

१२)  प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१३)  मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१४)  कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.

१५) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.